**महाराष्ट्रातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात नागरी पायाभूत व सामाजिक सुविधा निर्माण करणे व त्यांच्या बळकटीकरणासाठी "महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान" राबविण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक-एनयुआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- २० फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना :-**

वर्ष २००१ च्या जनगणनेनुसार महाराष्ट्रातील ४२.४ % लोकसंख्या सध्या नागरी भागात रहात असून पुढील २० वर्षात सदर प्रमाण ६० टक्क्यांच्यावर जाण्याची शक्यता आहे. देशातील सर्वाधिक नागरी लोकसंख्या असलेल्या आणि नागरिकरणाचा वेग देखील सर्वाधिक असलेल्या राज्यांमध्ये महाराष्ट्राचा समावेश आहे. राज्यातील नागरी भागांचा नियोजनबध्द पध्दतीने विकास करणे आवश्यक असून नियोजनबध्द विकासाच्या अभावी शहरांमध्ये झोपडपट्टयांची वाढ, बेरोजगारी, दारिद्रय, आरोग्य विषयक समस्या तसेच गुन्हेगारीमध्ये वाढ इ. प्रश्न निर्माण होऊ शकतात. मात्र नागरी भागाच्या विकासासाठी योग्य प्रकारे प्रयत्न केल्यास शहरांचा नियोजनबध्द विकास होऊन जनतेच्या राहणीमानाचा दर्जा उंचावू शकतो व नागरिकांना योग्य संधी उपलब्ध होऊन दरडोई उत्पन्नात तसेच राष्ट्रीय सकल उत्पन्नात वाढ होवू शकते. सध्या राज्यातील काही शहरांमध्ये पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी केंद्र शासनाकडून जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान राबविण्यात येत असून त्याच धर्तीवर राज्यातील नागरी भागांच्या नियोजनबध्द विकासाकरिता राज्यात एक सर्व समावेशक अभियान राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या विषयी सर्वकष विचार करुन शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-** राज्यातील नागरी भागांच्या दीर्घकालीन गरजांचा विचार करुन त्यांचा सुनियोजित विकास साधण्याच्या दृष्टीने **"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान"** या नावाखाली एक सर्व समावेशक अभियान राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर महाअभियानाची उद्दिष्टे, व्याप्ती, वित्तीय नियोजन, प्रकल्पांकरीता अनुदान व कर्ज उपलब्ध करुन देण्याची कार्यपध्दती इत्यादी बाबी पुढीलप्रमाणे राहतील.

०२. **महाअभियानाची उद्दिष्टे**:-

राज्यातील नागरी भागात शासनाने विहित केलेल्या मानकांप्रमाणे विविध मूलभूत नागरी सुविधा पुरविणे आणि तेथे शहराच्या दर्जाप्रमाणे शैक्षणिक व आरोग्य विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती करणे तसेच शहराच्या सामाजिक सुविधा व सौंदर्य आकर्षणामध्ये वृध्दी करणे ही " महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाची" प्रमुख उद्दिष्ट्ये असतील .

सदर महाअभियानांतर्गत राज्यातील नागरी भागात खालील प्रकारच्या पायाभूत सुविधांचा विकास करण्यावर व त्यात श्रेणीवाढ करण्यावर भर देण्यात येईल.

| अ.क्र. | नागरी पायाभूत सुविधा | मंत्रालयीन विभाग | प्राथम्य क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | **नागरी दळणवळण साधनांचा विकास :**<br>याअंतर्गत नागरी रस्ते व पूल, उड्डाणपूल, ROBs/RUBs, पर्जन्य जलवाहिन्या, नागरी परिवहन व्यवस्था, वाहतूक नियंत्रण व्यवस्था (Traffic Signalling System,), वाहनतळ इत्यादीं विकसित करण्यासंबंधी प्रकल्प हाती घेण्यात येतील. | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | I |
| २ | **घनकचरा व्यवस्थापन:**<br>या अंतर्गत नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २००० च्या अनुषंगाने आवश्यक पायाभूत सुविधा विकसित करणे व इतर उपाययोजना करणे यावर भर देण्यात येईल. | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | I |
| ३ | **नागरी रस्त्यावरील पथदिव्यांमध्ये ऊर्जा बचतीच्या योजना राबविणे तसेच नागरी भागात सौर ऊर्जेवर आधारित पथदिवे बसविणे.** | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | I |
| ४ | **नागरी भागात विहित मानकानुसार सामाजिक सोयी व सुविधांचा विकास करणे.** | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | II |
| ५ | **नागरी तीर्थक्षेत्रांचा सुनियोजित विकास करणे :**<br>या अतंर्गत राज्यातील नागरी भागातील प्रमुख तीर्थक्षेत्रांच्या परिसरात व सभोवती परिशिष्ट- अ मध्ये नमूद केल्यानुसार सार्वजनिक नागरी सोयी-सुविधांचा विकास करण्यावर भर देण्यात येईल. | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | III |
| ६ | **गिरीस्थानांचा सुनियोजित विकास करणे:**<br>याअतंर्गत ज्या गिरीस्थानांचा सुनियोजित विकास साधण्यासाठी उपाययोजना हाती घेता येतील त्यांचा तपशील परिशिष्ट- ब मध्ये देण्यात आला आहे. | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | III |
| ७ | **नागरी भागातील सार्वजनिक पुरातन वास्तूंचे जतन तसेच नागरी भागात उद्याने, तलाव, नैसर्गिक जलस्त्रोत यांचे संवर्धन व विकास करणे :**<br>या अंतर्गत ज्या प्रकारच्या सार्वजनिक पुरातन वस्तूंचे जतन करणे अनुज्ञेय असेल त्यांचे पात्रतेचे निकष परिशिष्ट -क मध्ये नमूद करण्यात आलेले आहेत. | **संबंधित विभाग**<br>नगर विकास विभाग | III |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | **पाणी पुरवठा, मलनि:स्सारण व नागरी स्वच्छता या क्षेत्रात शासनमान्य मानकांप्रमाणे पायाभूत सुविधा विकसित करणे किंवा त्यांची दर्जावाढ करणे :**<br>या अंतर्गत पाणी पुरवठा, मलनिस्सारण व नागरी स्वच्छता विषयक ज्या प्रकल्पांकरिता महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत अनुदान उपलब्ध होवू शकत नाही अश्या नागरी प्रकल्पांचा विचार करण्यात येईल. | **संबंधित विभाग**<br>पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग<br><br>**सहयोगी विभाग**<br>नगर विकास विभाग | I |
| ९ | **शालेय शिक्षणाशी निगडीत पायाभूत सुविधांचा विकास :**<br>या अंतर्गत नागरी भागात विहित मानकानुसार शालेय शिक्षणासाठी सार्वजनिक क्षेत्रात आवश्यक पायाभूत सुविधा (उदा. शाळा इमारत, वसतिगृहे, इ.)निर्माण करण्याकामी उपाययोजना हाती घेण्यात येतील. | **संबंधित विभाग**<br>शालेय शिक्षण विभाग<br><br>**सहयोगी विभाग**<br>नगर विकास विभाग | II |
| १० | **नागरी आरोग्याशी निगडीत पायाभूत सुविधांचा विकास :**<br>यात नागरी भागात विहित मानकानुसार सार्वजनिक क्षेत्रात आरोग्यविषयक पायाभूत सुविधा निर्माण करण्याकामी उपाययोजना हाती घेण्यात येतील. | **संबंधित विभाग**<br>सार्वजनिक आरोग्य विभाग<br><br>**सहयोगी विभाग**<br>नगर विकास विभाग | II |
| ११ | **आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी आवास योजना राबवून गलिच्छवस्ती मुक्त शहरे निर्माण करणे :**<br>या अंतर्गत नागरीक्षेत्रात वाढत्या गलिच्छवस्त्यांचा प्रश्न सोडविण्याकरीता आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांसाठी घर बांधणी कार्यक्रम हाती घेण्यात येईल. | **संबधित विभाग**<br>गृहनिर्माण विभाग<br><br>**सहयोगी विभाग**<br>नगर विकास विभाग | I |
| १२ | **नागरीक्षेत्रात पर्यावरणात सुधारणा घडवून आणणे या साठी उपायोजना करणे :**<br>या अंतर्गत नागरीक्षेत्रात प्रदूषण नियंत्रण व पर्यावरण संवर्धनाच्या उपाययोजना हाती घेण्यात येतील. | **संबधित विभाग**<br>पर्यावरण विभाग<br><br>**सहयोगी विभाग**<br>नगर विकास विभाग | I |

०३. **महाअभियानाची व्याप्ती :-**

"महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान" राज्यातील सर्व "ड" वर्ग महानगरपालिका व सर्व नगरपालिका/नगरपंचायती यांना लागू राहील. या महाअभियानांतर्गत विभागीय मुख्यालय व जिल्हा मुख्यालय स्तरावरील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना **प्रथम प्राधान्य** राहील. प्रत्येक जिल्ह्यात तालुका स्तरावरील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना, त्यानंतर त्यांच्या लोकसंख्येच्या क्रमाने प्राधान्य राहील व उर्वरित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना तद्‌नंतर प्राधान्य राहील. वरील प्राधान्यक्रमाप्रमाणे या महाअभियानाच्या **पहिल्या टप्प्यात,** जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानात समाविष्ट

असलेल्या अ/ब/क वर्ग महानगरपालिका वगळता, प्रत्येक जिल्हयातून **जिल्हा मुख्यालय** स्तरावरील शहरांचा तसेच त्या-त्या जिल्हयातील लोकसंख्येच्या दृष्टीने त्यानंतर लगत येणाऱ्या शहरांचा समावेश करण्यात येत आहे. त्याव्यतिरिक्त जिल्हयातील एखाद्या अन्य शहरात राज्य पातळीचे **प्रसिध्द गिरीस्थान** वा **तीर्थक्षेत्र** असल्यास त्या शहराचाही समावेश पहिल्या टप्प्यामध्ये करण्यात येत आहे. याप्रमाणे प्रस्तुत महाअभियानाच्या पहिल्या टप्प्यात ज्या शहरांचा समावेश करण्यात येत आहे त्यांची यादी परिशिष्ट- I देण्यात आली आहे.

परिशिष्ट-I मधील शहरांचे प्रस्ताव शासनस्तरावर मंजुरीस्तव विचाराधीन नसल्यास किंवा एखाद्याप्रसंगी तातडीची निकड निर्माण झाल्यास परिशिष्ट-I मधील यादी बाहेरील शहरांच्या प्रकल्पांचाही शासन मान्यतेने निधीच्या उपलब्धतेनुसार या महाभियानात एक विशेष बाब म्हणून पहिल्या टप्प्यात अर्थसहाय्यासाठी विचार करता येईल.

## ०४. <u>महाअभियानाअंतर्गत शहरांचे दिर्घकालीन नियोजन</u> :-

(i) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत सहभाग घेणाऱ्या प्रत्येक नागरी क्षेत्रासाठी शहराच्या पुढील २० वर्षांचा संभाव्य विकास लक्षात घेऊन शहर विकास आराखडा (City Development Plan) तयार करणे अनिवार्य राहिल. शहर विकास आराखड्यात भविष्यातील गरजांच्या आधारे विविध मूलभूत नागरी सुविधा, शैक्षणिक / आरोग्य विषयक पायाभूत सुविधा तसेच शहराच्या सामाजिक सोयींच्या विकासासाठी आवश्यक उपाययोजनांचा अंतर्भाव असेल.

(ii) शहराचे दीर्घकालीन नियोजन करतांना, विविध मूलभूत नागरी सुविधा तसेच शैक्षणिक व आरोग्य विषयक पायाभूत सुविधा कोणत्या दर्जाच्या पुरविण्यात याव्यात, यासाठी संबंधित मंत्रालयीन विभागाकडून विहित मानके विचारात घेण्यात यावीत. सध्या काही क्षेत्रातील शासन मान्य मानके परिशिष्ट- II मध्ये नमुद करण्यात आली आहेत. या शिवाय इतर विविध क्षेत्रातील मानके शासन मान्यतेने सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना स्वतंत्रपणे प्रसृत करण्यात येतील. सामाजिक सोयींसाठी संबंधित शहराचा मंजूर विकास आराखडा व शासनाने विहित केलेली मानके विचारात घेण्यात यावीत.

(iii) प्रत्येक शहराच्या शहर विकास आराखडयास संबंधित मंत्रालयीन विभागांच्या सहमतीने शासन स्तरावर नगर विकास विभागामार्फत मान्यता प्रदान करण्यात येईल.

(iv) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत शहर विकास आराखडयातील प्रकल्पांचाच अर्थसहाय्यासाठी विचार करण्यात येईल. तथापि, अभियानाच्या पहिल्या वर्षी स्थानिक गरजांचा विचार करता शहर विकास आराखडा तयार होण्याची वाट न पहाता या अभियानाच्या इतर अटी /शर्तीच्या अधीन राहून पाणी पुरवठा / मल:निस्सारण / घनकचरा व्यवस्थापन या क्षेत्रातील प्रकल्पांचा अर्थ सहाय्याकरीता विचार करण्यात येईल. मात्र अशा प्रकरणी देखील नंतर एक वर्षाच्या आत वरील प्रमाणे शहर विकास आराखडा तयार करुन शासनास सादर करणे अनिवार्य राहिल.

## ०५. <u>महाअभियानाअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या प्रकल्प प्रस्तावांना मंजूरी देण्याची कार्यपध्दती</u> :-

(i) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानात सहभागी होण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने राज्य शासनाबरोबर **सामंजस्याचा लेखी करार** करुन शासनाने विहित केलेला सुधार कार्यक्रम राबविण्यासाठी कालबध्द कार्यक्रम मान्य करणे बंधनकारक राहील व याबाबत ठराव करणे आवश्यक राहील. सदर महाअभियानांतर्गत सहभागी होऊ इच्छिणा-या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना ज्या प्रमुख सुधारणांचा अंगीकार करणे आवश्यक राहील त्या पुढीलप्रमाणे :-

१)	द्विनोंद लेखा पध्दतीचा अवलंब करणे .
२)	महानगरपालिका / नगरपालिका यांच्या कामकाजाचे संगणकीकरण करणे
३)	मालमत्ता कर विषयक सुधारणा.
४)	उचित उपभोक्ता आकार वसुली संबंधी सुधारणा.
५)	नागरी क्षेत्रातील गरीबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.
६)	नागरी क्षेत्रातील गरीबांच्या वस्त्यांना आवश्यक नागरी सुविधा पुरविणे .
७)	पर्जन्यजल संचय (Rain Water Harvesting).
८)	सांडपाण्याचा पुर्नवापर (Recycling and Reuse of Waste Water).
९)	नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्रात पाणी बचतीच्या उपाययोजना राबविणे.
१०)	नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्रात ऊर्जा बचतीच्या उपाययोजना राबविणे.
११)	सार्वजनिक-खाजगी सहभाग (पीपीपी) तत्वावर आधारीत प्रकल्पांना /उपाययोजनांना चालना देणे.
१२)	प्रशासकीय सुधारणा .

या व्यतिरिक्त शासन वेळोवेळी इतर सुधारणांचाही अंतर्भाव या महाभियानात आवश्यकतेनुसार करेल.

(ii) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने सुधार कार्यक्रम राबविण्याबाबत ठराव करुन शासनाशी **सामंजस्याचा लेखी करार** केल्यावर त्यांनी आपला **शहर विकास आराखडा** तयार करुन राज्य शासनास सादर करणे आवश्यक राहील. सदर शहर विकास आराखडा सर्व संबंधित मंत्रालयीन विभागांशी विचार विनिमय करुन आवश्यक त्या सुधारणांसह शासन स्तरावर मंजूर करण्यात येईल. शहर विकास आराखडा मंजूर झाल्यानंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्या आधारे शहर विकास आराखड्यात विविध क्षेत्रात संकल्पित प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प आराखडे तयार करुन शासनास सादर करावेत.

(iii) सविस्तर प्रकल्प आराखडे तयार करण्याची क्षमता नसलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांसाठी **महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड** ( MUIDCL) ही शासन प्रणीत कंपनी प्रकल्प विकसित करण्याकामी मदत करेल. या संदर्भात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मदत करण्यासाठी MUIDCL मध्ये "**प्रकल्प विकास निधी**" {Project Development Fund (PDF)} कार्यान्वित करण्यात आला आहे. संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने विनंती केल्यास MUIDCL ही कंपनी त्यांच्याकडील प्रकल्प विकास निधीचा वापर करुन नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करुन देईल, *मात्र अशा परिस्थितीत प्रत्यक्ष प्रकल्प विकासासाठी झालेला खर्च अधिक या खर्चाच्या २५ % पर्यंत सेवाशुल्क MUIDCL ला अदा करणे आवश्यक राहील व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था व MUIDCL यांच्यामध्ये तसा करार करण्यात येईल.*

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत प्रकल्प राबविण्यासाठी राज्य शासन स्वत: किंवा महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी मर्यादित (MUIDCL) या कंपनीमार्फत विविध प्रकारच्या तज्ञांची सूचीवर नियुक्ती ( empanelment ) करील. उदा:-

१)	शहर विकास आराखडा तयार करण्यासाठी सल्लागारांचे पॅनल
२)	विविध स्वरुपाच्या पायाभूत सुविधांकरिता तांत्रिक सल्लागारांचे पॅनल

३)  प्रकल्प व्यवहार सल्लागार (Transaction Adviser )

- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वत: अश्या सूचीवरील तज्ञांमार्फत शहर विकास आराखडा तयार करण्याचे ठरविल्यास किंवा त्यातील प्रकल्प विकसित करण्याचे ठरविल्यास आणि शहर विकास आराखडा किंवा प्रकल्प विकसित करण्यासंबंधी खर्च भागविण्यासाठी कर्जाची मागणी केल्यास MUIDCL ही कंपनी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वरील प्रयोजनार्थ सवलतीचे कर्ज देखील मंजूर व वितरीत करु शकेल.

(iv) **महाअभियाना अंतर्गत प्रकल्प अहवालांच्या तांत्रिक व वित्तीय मूल्यमापनाची व्यवस्था:-** महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत शासनाकडे सादर करण्यात येणाऱ्या सविस्तर प्रकल्प अहवालांचे तांत्रिक मूल्यमापन संबंधित क्षेत्रातील राज्यस्तरीय यंत्रणांमार्फत उदा.सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण इ. मार्फत करण्यात येईल. सार्वजनिक खाजगी सहभागावर आधारित प्रकल्पांचे मूल्यमापन सिकॅाम किंवा राज्य शासनाने यासाठी निर्देशित केलेल्या यंत्रणांमार्फत करण्यात येईल. याकरिता संबंधित मूल्यमापन यंत्रणेस प्रकल्प खर्चाच्या ०.२५ % पर्यंत "मूल्यमापन फी " आकारण्याची मुभा राहील. सदर खर्च प्रथम संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करावयाचा आहे व प्रकल्प मंजूर करताना सदर खर्च प्रकल्पाच्या मंजूर किंमतीत अंतर्भूत करण्यात येईल.

(v) **महाअभियाना अंतर्गत प्रकल्प मंजूरीसाठी प्रकल्प मान्यता व संनियंत्रण समिती :-**
महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत परिच्छेद ०२ मध्ये नमूद केलेल्या पायाभूत सुविधांशी निगडीत प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी खालीलप्रमाणे **"प्रकल्प मान्यता व संनियंत्रण समिती"** गठीत करण्यात येत आहे.

(अ) परिच्छेद ०२ मधील तक्त्यातील क्र. १ ते ७ येथील पायाभूत सुविधांशी निगडीत प्रकल्पांच्या मंजूरीसाठी खालील प्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

- सचिव (नगर विकास-२) - अध्यक्ष
- प्रधान सचिव (वित्त) किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेला उप सचिव पेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी - सदस्य
- प्रधान सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेला उप सचिव पेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी - सदस्य
- आयुक्त व संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय - सदस्य
- व्यवस्थापकीय संचालक, MUIDCL - सदस्य
- नगर विकास विभागास आवश्यक वाटतील असे अन्य अधिकारी आणि संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती - सदस्य

(ब) परिच्छेद ०२ मधील तक्त्यातील क्र. ८ ते १२ येथील विषयांशी निगडीत प्रकल्पांच्या मंजूरीसाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

- संबंधित प्रशासकीय विभागाचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव - अध्यक्ष

- प्रधान सचिव (वित्त) किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेला उप सचिव पेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी - सदस्य
- प्रधान सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेला उप सचिव पेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी - सदस्य
- सचिव, नगर विकास - २ - सदस्य
- आयुक्त व संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय - सदस्य
- व्यवस्थापकीय संचालक, MUIDCL - सदस्य
- संबंधित विभागास आवश्यक वाटतील असे अन्य अधिकारी आणि संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती - सदस्य

*वरील (अ) किंवा (ब) प्रमाणे प्रकल्प मान्यता व संनियत्रण समितीने प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर शासन कार्यनियमावलीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रकल्पास मान्यता देण्याकामी अंतिम निर्णय घेण्यात येईल.*

०६. **महाराष्ट्र सुवर्णजंयती नगरोत्थान महाअभियानांतर्गत अनुज्ञेय अर्थसहाय्य :-**

(i) प्रकल्प मान्यता व संनियंत्रण समितीच्या मान्यतेनंतर शासन स्तरावर प्रचलित कार्य नियमावलीनुसार अंतिम मान्यताप्राप्त प्रकल्प खालील तीन प्रकारे राबविता येतील.

(१) पूर्णत: सार्वजनिक- खाजगी सहभागातून (Public Private Partnership तत्वावर.)

(२) सार्वजनिक खाजगी सहभागातून पूर्णत: न होण्याजोगे प्रकल्प हे वर्धनक्षम होण्यासाठी "तूटीचा अर्थभरणा" (Viability Gap Funding) करण्याकामी अनुदान व कर्ज मंजूर करुन.

(३) सार्वजनिक खाजगी सहभाग तत्वावर न राबविता येणा-या प्रकल्पांसाठी अनुदान व कर्ज मंजूर करुन.

(ii) सदर महाअभियानांतर्गत शहर विकास आराखडयातील प्रकल्पांची अंमलबजावणी करताना सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर प्रकल्प राबविण्यास (With or without Viability Gap) प्राधान्य देण्यात यावे. *सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर प्रकल्प राबविण्यास चालना देण्याच्या दृष्टीने शासन विविध स्वरुपाच्या पायाभूत सुविधा सार्वजनिक खाजगी सहभाग तत्वावर निर्माण करण्यासाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना, आदर्श करारनामे व निविदा अभिलेख विकसीत करुन स्वतंत्रपणे सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्रसृत करेल.* जेथे सार्वजनिक खाजगी सहभागातून प्रकल्प राबविणे शक्य नाही असे प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या सध्या राबविण्यात येणा-या योजनांतर्गत उपलब्ध निधी वापरणे शक्य आहे किंवा कसे याचा विचार करण्यात यावा व शक्य असल्यास तसे करण्यात यावे. केंद्र शासनाच्या योजनांतर्गत सदर काम घेणे शक्य नसल्यास अशा कामांसाठी सदर महाअभियानांतर्गत अर्थसहाय्य करण्याबाबत विचार करण्यात येईल.

(iii) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत हाती घ्यावयाच्या पायाभूत सुविधांशी निगडीत प्रकल्पांना वर नमूद केल्यानुसार प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आल्यावर अशा प्रकल्पांसाठी खाली नमूद केलेल्या वित्तीय आकृतीबंधानुसार अर्थसहाय्य देय व अनुज्ञेय राहील :-

(अ) जे प्रकल्प पूर्णत: सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर राबविता येतील त्यासाठी कोणत्याही प्रकारे अर्थसहाय्याची आवश्यकता भासणार नाही.

(ब) जे प्रकल्प केवळ सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर पूर्णत: राबविता येणार नाहीत व ज्यांच्यासाठी काही प्रमाणात तूटीचा अर्थभरणा (Viability Gap Funding) यासाठी अर्थसहाय्य लागेल, त्यांच्यासाठी खालीलप्रमाणे अर्थसहाय्य देय व अनुज्ञेय राहील.

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्था | अनुदान (वर्धनक्षमता तफावतीच्या रकमेपैकी) | MUIDCL/ MMRDA मार्फत, कमाल कर्ज मर्यादा (वर्धनक्षमता तफावतीच्या रकमेपैकी) |
|---|---|---|---|
| १ | "ब" व "क" वर्ग नगरपालिका/ नगरपंचायती | ८० % | २०% |
| २ | "अ" वर्ग नगरपालिका / "ड" वर्ग महानगरपालिका | ५०% | ५०% |

(क) सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर आधारीत नसलेल्या प्रकल्पांसाठी पुढीलप्रमाणे अर्थसहाय्य देय व अनुज्ञेय राहील..

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्था | अनुदान (प्रकल्पाच्या मंजूर किंमतीपैकी) | MUIDCL/ MMRDA मार्फत कमाल कर्ज मर्यादा (प्रकल्पाच्या मंजूर किंमतीपैकी) |
|---|---|---|---|
| १ | "ब" व "क" वर्ग नगरपालिका/ नगरपंचायती | ८० % | २०% |
| २ | "अ" वर्ग नगरपालिका / "ड" वर्ग महानगरपालिका | ५०% | ५०% |

वरील तक्त्यात दर्शविलेली कर्जाची टक्केवारी ही कमाल कर्जाची मर्यादा दर्शविते. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वत:च्या निधीतून काही रक्कम मंजूर प्रकल्पावरील खर्चापोटी उपलब्ध करुन दिल्यास कर्जाचे प्रमाण त्यानुसार कमी होणार आहे.

(iv) या महाअभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी कर्ज स्वरुपातील रकमा महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी मर्यादित (MUIDCL) या शासनप्रणीत कंपनी मार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील. मुंबई महानगर क्षेत्रविकास प्राधिकरण (MMRDA) यांच्या कार्यक्षेत्रातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना या महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी कर्जाचा हिस्सा मुंबई महानगर प्रदेश क्षेत्र विकास प्राधिकरणामार्फतही प्राधिकरणाच्या मंजूरीने उपलब्ध होवू शकेल किंवा Mumbai Mega City Scheme Revolving Fund मधूनही मंजूर करता येईल.

०७. <u>महाअभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांना अनुदान व कर्ज उपलब्ध करुन देण्याची कार्यपध्दती :-</u>

(i) सदर महाअभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी लागणा-या अनुदानाची रक्कम शासनाकडून अर्थसंकल्पीय तरतुदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल. या शासननिर्णयातील परिच्छेद ०२ येथील तक्त्यातील अनु. क्र. १ ते १० या क्षेत्रातील पायाभूत सुविधांशी निगडीत प्रकल्पांकरिता नगर विकास विभागाकडून परिच्छेद ०८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्पीय तरतूदीतून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल. अनु क्र. ११ व १२ वरील उपाययाजेनांकरिता संबंधित मंत्रालयीन विभागांकडून त्या विभागाच्या योजनांतर्गत उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीचा वापर करण्यात येईल.

(ii) महाभियानांतर्गत घ्यावयाच्या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देऊन त्यासाठी अनुदानाचा हिस्सा मंजूर करुन त्याकरिता कर्जाचा हिस्सा मंजूर करण्यासाठी प्रस्ताव नगर विकास विभागामार्फत MUIDCL किंवा यथास्थिती MMRDA कडे पाठविण्यात येईल. MUIDCL / MMRDA मार्फत कर्ज तत्वत: मंजूर झाल्यानंतर अनुदानाच्या रकमेचे वितरण शासनाकडून करण्यात येईल व कर्जाचे वितरण त्यानंतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या मागणी नुसार MUIDCL किंवा यथास्थिती MMRDA मार्फत करण्यात येईल.

(iii) मंजूर प्रकल्पांना अनुज्ञेय शासनाचे अनुदान दोन टप्प्यात मंजूर करण्यात येईल. अनुदानाचा ५० टक्के भाग प्रकल्प मंजूरी नंतर वितरीत करण्यात येईल. उर्वरीत ५० टक्के अनुदान प्रथम टप्प्याच्या अनुदानाच्या ७० टक्के रक्कम खर्च झाल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर वितरीत करण्यात येईल. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस आवश्यक असल्यास कर्जाची रक्कम त्यानंतर वर नमूद केल्याप्रमाणे मंजूर व वितरीत करण्यात येईल.

(iv) महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत हाती घ्यावयाच्या नगरविकास विभागाच्या पायाभूत सुविधांशी निगडीत प्रकल्पांकरिता शासन स्तरावरुन अनुदानाचा हिस्सा उपलब्ध करुन देण्यासाठी नगर विकास विभागामार्फत परिच्छेद ०८ मध्ये नमूद केल्यानुसार संबंधित लेखाशीर्ष अंतर्गत दरवर्षी नियतव्ययाच्या उपलब्धतेनुसार तरतूद करण्यात येईल.

(v) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांना सवलतीच्या दराने कर्ज पुरवठा करणे शक्य व्हावे याकरिता MUIDCL या शासन प्रणीत कंपनीला सक्षम करण्यासाठी राज्य शासन व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्यामार्फत महाराष्ट्र अर्बन इंन्फ्रास्ट्रक्चर फंड (MUIF) मध्ये प्रत्येकी रु.२५० कोटी इतकी गुंतवणूक करुन रु.५०० कोटीचा स्वतंत्र "प्रकल्प वित्त-पुरवठा निधी" (Project Finance Fund) स्थापन करण्यासाठी शासन निर्णय क्रमांक: एनयूआर-२००९ / प्र.क.१२७ / ०९ / नवि-३३, दि. ३१.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली असून सदर प्रकल्प वित्त-पुरवठा निधी कार्यान्वीत करण्याकरीता MUIF मध्ये रुपये ५०० कोटीचा निधी स्थापन करण्यासाठी शासनाकडून रुपये २५० कोटी एवढे अंशदान देण्याचा शासन निर्णय वरीलप्रमाणे निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर निधीच्या आधारे MUIDCL ही शासनप्रणीत कंपनी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून किंवा अन्य वित्तीय संस्थांकडून आवश्यकतेनुसार कर्ज उभारेल व त्या माध्यमातून उपलब्ध निधीतून MUIDCL प्रस्तुत महाअभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांकरीता सवलतीच्या दराने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कर्ज मंजूर व वितरीत करेल. ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्था मुंबई महानगर क्षेत्रात मोडतात, त्यांच्या या महाभियानांतर्गत मंजूर होणाऱ्या प्रकल्पांकरिता कर्जाचा हिस्सा Mumbai Mega City Scheme Revolving Fund किंवा MMRDA कडूनही उपलब्ध करुन देता येवू शकेल.

**०८. <u>महाअभियानातंर्गत निधीची तरतूद करण्यासाठी कार्यपध्दती</u> :-** " महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान" या अंतर्गत हाती घ्यावयाच्या विविध प्रकारच्या प्रकल्पांकरीता अनुदानाचा हिस्सा देण्याकरीता राज्य स्तरावर दरवर्षी खालील लेखाशिर्षाखाली आवश्यकता व उपलब्धतेनुसार तरतूद करण्यात येईल.

"मागणी क्र.एफ-२ ,२२१७, नगर विकास ८०, सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका नगर विकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे इत्यादींना सहाय्य , (००)(५७) महाराष्ट्र नगरोत्थान महाअभियानांतर्गत सहाय्यक अनुदान (२२१७ ८०२ १) दत्तमत (योजनांतर्गत) ३१, सहाय्यक अनुदान"

या व्यतिरिक्त महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत या शासननिर्णयाच्या परिच्छेद ०२ मध्ये दर्शविलेल्या ज्या क्षेत्रातील प्रकल्प अनुज्ञेय आहेत त्या क्षेत्रातील लहान प्रकल्पांकरिता जिल्हा नियोजन मंडळामार्फत जिल्हा योजने अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना अनुदान उपलब्ध व्हावे, यासाठी एक स्वतंत्र लेखाशीर्ष उघडण्यात येईल. त्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. जिल्हा योजने अंतर्गत सदर लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतुदींतून घ्यावयाच्या प्रकल्पांसाठी देखील संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची मागणी असल्यास परिच्छेद ६ (iii) मध्ये दर्शविलेल्या वित्तीय आकृतिबंधाच्या अधिन राहून आवश्यक कर्जाचा हिस्सा, MUIDCL किंवा यथास्थिती MMRDA कडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

**०९. <u>महाअभियानाची प्रशासकीय यंत्रणा</u> :-** सदर अभियान राबविण्याकरीता मंत्रालयीन स्तरावर नगर विकास विभाग तसेच आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय येथे एक स्वतंत्र कक्ष स्थापन करण्यात येईल. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय हे या महाअभियानासाठी राज्यस्तरीय नोडल एजन्सी म्हणून काम पाहातील.

राज्यस्तरीय नोडल एजन्सी (SLNA) ही JNNURM व UIDSSMT या योजनांच्या धर्तीवर महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत पर्यवेक्षण, संनियंत्रण व समन्वयाचे काम खालील प्रमाणे पार पाडेल:-

(अ) राज्यस्तरीय नोडल एजन्सी ही सदर अभियानांतर्गत घेण्यात येणाऱ्या प्रकल्पांच्या **अंमलबजावणीसाठी** पर्यवेक्षीय संस्था म्हणून काम करेल व मंजूर प्रकल्पांची तसेच सदर अभियानांतर्गत विहित सुधार कार्यक्रमांची अंमलबजावणी वेळेवर व सुनियोजितरित्या होत आहे हे सुनिश्चित करेल व शासनास वेळोवेळी यासंदर्भात प्रगती अहवाल सादर करेल.

(ब) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून शहर विकास आराखडा तयार करुन घेणे, तद्नंतर शहर विकास आराखड्यामध्ये समाविष्ट असलेल्या प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करुन घेणे व सदर सविस्तर प्रकल्प अहवालांची तांत्रिक तपासणी करुन घेवून त्यांना प्रशासकीय मान्यतेसाठी शासनाकडे सादर करणे या बाबींचे समन्वयन SLNA यांनी करावयाचे आहे.

(क) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून वरील (ब) मधील कार्यपध्दती अवलंब करुन प्राप्त झालेले प्रकल्प शासनाकडून मंजूर झाल्यानंतर आश्या प्रकल्पांसाठी शासनाकडून अनुदान SLNA मार्फत नागरी संस्थांना वितरीत करण्यात येईल.

(ड) मंजूर प्रकल्पांच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व प्रकल्पांचे पूर्णत्वाचे प्रमाणपत्र संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी SLNA ची राहील.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग आणि वित्त विभाग यांच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५/१४४४, दिनांक २०/०५/२००९ व क्रमांक ११/१०/व्यय-३, दिनांक ०६/०१/२०१० अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
सचिव
नगर विकास विभाग

प्रत,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, गृहनिर्माण/पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे , मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, (फोर्ट), मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, नगर रचना, पुणे.
आयुक्त व संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, सर्व महानगरपालिका/ मुख्याधिकारी सर्व नगरपरिषदा
निवडनस्ती (नवि-३३)

**शासन निर्णय क्रमांक:एनयूआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३, दि. २० फेब्रुवारी, २०१० या सोबतचे**

# परिशिष्ट - अ

## नागरी तिर्थक्षेत्रांचा सुनियोजित विकास

राज्यातील नागरी क्षेत्रातील तिर्थक्षेत्रांचा विकास करण्यासंबंधीचा कार्यक्रम नगर विकास विभागामार्फत राबविण्यात येत असून सद्य:स्थितीत नागरी भागातील तिर्थक्षेत्रांना निधी उपलब्ध करुन देण्यासाठी शासन स्तरावर सचिव (नवि) यांचे अध्यक्षतेखाली तिर्थक्षेत्रांचे वर्गीकरण व निकष ठरवण्यासाठी शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-१०९७/६८४/नवि-१८, दि.२६/२/१९९७ च्या शासन निर्णयान्वये समिती स्थापन करण्यात आलेली आहे. तर शासन निर्णय क्रमांक:तिक्षेवि-२००२/५६८/प्र.क्र.८९/२००२/नवि-१८, दि.२४ ऑगस्ट, २००४ नुसार तिर्थक्षेत्रांचे निवडीसाठी व तीर्थक्षेत्र विकास योजनांचे आराखडे मंजूर करण्याबाबतचे निकष ठरविण्यात आले आहेत.

०२ सर्वसाधारणपणे नागरी तिर्थक्षेत्रांचे अ,ब, आणि क याप्रमाणे वर्गीकरण केले जाते :-

अ) "अ" वर्ग तिर्थक्षेत्र म्हणजे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय महत्वाची ठिकाणे. केंद्र शासन/ परराष्ट्राकडून मिळणा-या अर्थसहाय्याने विकसीत करण्यात येणारी ठिकाणे.

ब) "ब" श्रेणी तिर्थक्षेत्र म्हणजे राज्यस्तरावरील महत्वाची ठिकाणे. राज्याच्या अर्थसंकल्पीय साधन संपत्ती मधून विकसित करण्यात येणारी स्थळे.

क) "क" श्रेणी तिर्थक्षेत्र म्हणजे जिल्हास्तरावर स्थानिक महत्व असलेली ठिकाणे. जिल्हा नियोजन मंडळाने उपलब्ध केलेल्या तरतूदी मधून विकसित करण्यात येणारी ठिकाणे.

०३. राज्यातील कोणत्याही नागरी तीर्थक्षेत्र विकासाचे प्रस्ताव अर्थसहाय्यासाठी सादर करतांना सदर तिर्थक्षेत्राच्या परिसरात व सभोवती भाविकांसाठी आवश्यक सोई-सुविधा सार्वजनिक क्षेत्रात विकसित करण्याच्या दृष्टीने सदर तीर्थक्षेत्राचा बृहत आराखडा तयार करुन त्या आधारेच नागरीकांना आवश्यक सोयी-सुविधांचे प्रस्ताव मंजूरीस्तव सादर करणे बंधनकारक राहील.

०४ यापुढे "अ" व "ब" वर्गीय तिर्थक्षेत्रांनाच शासन स्तरावरुन *"मागणी क्र. एफ-२, २२१७-नगर विकास १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगर विकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्यक पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ३१ सहाय्यक अनुदाने (००) (१४) यात्रास्थळांच्या विकासाचा विशेष कार्यक्रम (२२१७ ०९५ १)"* या लेखा शीर्षाखाली निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. त्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्तामार्फत शासनास प्रस्तावाची शिफारस करणे आवश्यक राहील. सदर नागरी तीर्थक्षेत्र असलेल्या शहराचा समावेश महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या पहिल्या टप्प्यातील शहरांमध्ये असणे आवश्यक नाही. मात्र जेव्हा अश्या शहरांचा दीर्घकालीन शहर विकास आराखडा तयार करण्यात येईल त्यावेळी शहर विकास आराखड्यात शहरातील अ/ब वर्गीय तीर्थक्षेत्राच्या बृहत आराखड्याचा समावेश करणे आवश्यक राहील.

०५. "क" वर्गीय तिर्थक्षेत्रांबाबत जिल्हा नियोजन मंडळामार्फत जिल्हास्तरावर तरतूद उपलब्ध करुन घेणे आवश्यक राहील. सदर निधी उपलब्ध करण्यासाठी वेगळे लेखाशीर्ष जिल्हा योजनेअंतर्गत उपलब्ध करुन देण्यात येईल. "क" वर्ग तिर्थक्षेत्रासंदर्भात जिल्हा नियोजन मंडळास तिर्थक्षेत्राची निवड करणे,

